कारागृह उद्योगाचा विकास करण्यासाठी अनुदान उपलब्ध करुन देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- बीजीटी -०१२०/६/प्र.क्र.६८/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ७ फेब्रुवारी, २००१.**

**<u>पहा-</u>** १) शासन निर्णय क्र.एमएजे ०१२०/४/प्र.क्र.४६/पीआरएस-२, दिनांक १५.११.२०००.

२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम दिनांक ११.७.२००१.

३) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-एफसीटी /पंवायो/ २००१-२००२/क,६ (१) दिनांक १२.१०.२००१.

**<u>शासन निर्णय :-</u>** कारागृह उदयोगाचा विकास करण्यासाठी साधन सामुग्री खरेदी करण्याकरिता सन २००१-२००२ मध्ये मंजूर झालेले अनुदान रु. २०,३२,०००/- उपलब्ध करुन दयावेत अशी कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य पुणे यांनी शासनाला विनंती केली आहे. ही विनंती विचारात घेऊन वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम,दिनांक ११.७.२००१ व वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन मधील अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७(२) (अ) अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तिय अधिकाराचा वापर करुन कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या कार्यालयास कारागृहाच्या उदयोगाचा विकास करण्यासाठी रु.२०,३२,०००/- (रु.वीस लक्ष बत्तीस हजार फक्त इतके अनुदान चालू आर्थिक वर्षात खर्च करण्यास शासन या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष २०५६०१०६" उपशिर्ष १०१(चार) कारागृहाच्या उदयोगाचा विकास २०,इतर खर्च, ३२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री, ३३ सामुग्री व पुरवठा " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा. व सन २००१-२००२च्या मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

३. हा शासन निर्णय विभागाच्या प्रधान सचिवांच्या मान्यतेने तसेच वित्त विभाग,शासन निर्णय, क्र. विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१ व वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन मधील अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७

(२)(अ) अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तिय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग्रं. य. सोनावणे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
अधिक्षक,मध्यवर्ती कारागृह येरवडा,पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
गृह विभाग, कार्यासन (बीयुडी-१),मंत्रालय,मुंबई.
गृह विभाग, निवडनस्ती,पीआरएस-२.